**शासकीय कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या मंजुरीबाबत......**
**प्रतिपुर्तीच्या अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा व मंजूरीच्या अधिकारांत सुधारणा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती**
**भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः वैखप्र-२०१९/प्र.क्र.११४९/विजाभज-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक: २७ नोव्हेंबर, २०१९.

वाचा : शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक-वैखप्र-२०१८/प्र.क्र.४८८/२०१८/राकावि-२, दिनांक ०६ जून, २०१९

**प्रस्तावना:-**

शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ मधील तरतुदींच्या अधीन राहून, आकस्मिक उद्भवणाऱ्या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर, शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपुर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारावरील, वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रुपये-३,००,०००/- च्या कमाल मर्यादेत, प्रतिपुर्तीस मंजुरी देण्याचे अधिकार उपरोक्त दिनांक १६.०३.२०१६ च्या शासन निर्णयानुसार विभाग प्रमुखांना आहेत. या मर्यादेबाहेरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीची प्रकरणे संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे सादर केली जातात.

सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्या वाचा येथील शासन निर्णयान्वये वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रकरणाबाबत वित्तीय अधिकारात बदल केला आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाने केलेला बदल या विभागाच्या आश्रमशाळेतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या प्रकरणांना लागू करण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या वाचा येथील दिनांक ६ जून, २०१९ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार या विभागाच्या आश्रमशाळातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीची प्रकरणे मंजूरीचे वित्तीय अधिकार खालीलप्रमाणे राहतील.

| सक्षम प्रधिकारी | पूर्वीचे अधिकार | सुधारीत अधिकार |
|---|---|---|
| प्रशासकीय विभाग प्रमुख ( प्रधान सचिव/सचिव, इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई ) | रुपये-३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) वरील प्रकरणे | रुपये-३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) वरील प्रकरणे. |
| विभाग प्रमुख (संचालक, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ) | रुपये-३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) पर्यंत | रुपये-२,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लक्ष) वरील परंतु रुपये-३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष) पर्यंतची प्रकरणे. |
| प्रादेशिक विभाग प्रमुख (प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग) | निरंक | रुपये-२,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लक्ष) पर्यंतची प्रकरणे. |

३. रुपये ३,००,०००/- वरील वैद्यकीय खर्चाच्या प्रपिपुर्तीच्या प्रकरणांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदींच्या अधीन राहून मंजुरी देण्याचे अथवा उचित निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार पूर्वी प्रमाणेच संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना राहतील.

४. शासन याद्वारे असे निर्देश देत आहे की, वर नमूद केल्याप्रमाणे मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख, विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख यांच्या स्तरावर विजाभज आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या प्रकरणांना मंजुरी देताना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदी काटेकोरपणे तपासून मंजुरी देण्याची जबाबदारी सक्षम प्राधिकाऱ्याची राहील.

५. हा शासन निर्णय प्रलंबित प्रकरणांना देखिल लागू करण्यात यावा.

६. हे आदेश संदर्भाधीन क्रमांक २ येथील सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-वैखप्र-२०१८/प्र.क्र.४८८/२०१८/राकावि-२, दिनांक ०६ जून, २०१९ नुसार वाढविण्यात आलेल्या मर्यादेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२७१४५२५८२०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.11.27 14:58:37 +05'30'

**(भा. र. गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव.
५. मा. प्रधान सचिव, इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग.
६. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, इमाव, सावशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
९. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण.
१०. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
११. सर्व प्राचार्य / मुख्याध्यापक ( संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांचेमार्फत )
१२.निवड नस्ती (विजाभज-२)